समाधानकारक प्रगती न केलेल्या सहकारी सूतगिरण्यांचे परिसमापन (Liqudation) / अवसायनात घेण्याच्या अनुषंगाने कार्यवाही करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सूतगि ३३१५/प्र.क्र.२२/टेक्स १ (अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १९ जून, २०१८.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मधील कलम १०२ मध्ये सहकारी संस्थांच्या परीसमापनाची कार्यपध्दती नमूद करण्यात आली आहे. सदर कलमातील तरतूदीनुसार निबंधक कलम ८३ अन्वये चौकशी केल्यावर किंवा कलम ८४ अन्वये निरीक्षण केल्यावर किंवा संस्थेच्या लेख्यांची लेखा परीक्षा करणाऱ्या लेखापरीक्षकांचा अहवाल प्राप्त झाल्यानंतर किंवा संस्थेच्य विशेष सर्वसाधारण सभेत ¾ सदस्यांनी ठराव संमत केल्यास परिसमापनाची कार्यवाही सुरु करु शकतात. तसेच ज्या संस्थेने I) काम सुरु केलेले नाही किंवा II) काम बंद केले आहे किंवा III) ५०० रुपयांपेक्षा अधिक नाही इतक्या किंमतीचे भाग किंवा सदस्यांच्या अनामत रक्कमा अशा संस्थेच्या ताब्यात आहेत किंवा IV) या अधिनियमातील किंवा नियमातील किंवा उपविधीतील नोंदणी व व्यवस्थापन याबाबतच्या कोणत्याही शर्तीचे अनुपालन करणे बंद केले आहे अशा संस्थेंच्या बाबतीत समापन करण्यात येते. महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मधील सदर तरतूदीस अनुसरुन समाधानकारक प्रगती न केलेल्या सहकारी सूतगिरण्यांचे परीसमापन / अवसायनात घेण्याच्या अनुषंगाने निकष निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुसार शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे :-

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मधील सहकारी संस्थांच्या परीसमापनाबाबतच्या कार्यपध्दतीस अनुसरुन सहकारी सूतगिरण्यांचे परीसमापन / अवसायनाची कार्यवाही खालील प्रमाणे नमूद निकषांचे पालन न केल्यास करण्याबाबत शासन निर्णय घेत आहे.

सहकारी सूतगिरण्यांचे परीसमापन / अवसायनात घेण्याची कार्यवाही करणे याबाबतचे निकष खालील प्रमाणे आहेत :-

१) ज्या सहकारी सूतगिरण्यांनी शासकीय भागभांडवल अंतिम हप्ता / अल्प रकमेच्या हप्त्याची मागणी केलेली नाही व शासनाने यापुर्वी शासकीय भागभांडवल देऊन सुध्दा गिरणी उत्पादनाखाली आलेली नाही अशा बाबतीत अवसायनाची कार्यवाही करुन सूतगिरणीकडे असलेली जमीन विकून शासनाची रक्कम वसुल करण्यात येईल.

२) शासनाने एकूण भागभांडवलाच्या १५ % भागभांडवल देऊन १ वर्ष झाल्यानंतरही एकूण प्रकल्प अहवालच्या ३३ % काम पुर्ण केले नसल्यास अशी सूतगिरणी अवसायनात घेण्यात येईल.

३) शासनाने एकूण भागभांडवलाच्या ३० % भागभांडवल देऊन २ वर्षे झाल्यानंतरही एकूण प्रकल्प अहवालाच्या ६६ % काम पूर्ण केले नसल्यास अशी सूतगिरणी अवसायनात घेण्यात येईल.

४) ज्या सहकारी सूतगिरण्यांना पूर्ण अथवा ९९ % शासकीय भागभांडवल देण्यात आले आहे व ४ वर्षे उलटूनही सूतगिरणीने उत्पादनाला सुरुवात केलेली नाही अशा सूतगिरण्यां अवसायनात घेण्यात येतील.

५) उपरोक्त मुद्दा क्र.१ ते ४ नुसार पुढील आवश्यक ती कार्यवाही करण्यासाठी सहकारी सूतगिरण्यांना सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून ६ महिन्यांचा कालावधी देण्यात येत आहे. सदर ६ महिन्यांच्या कालावधीत सहकारी सूतगिरण्यांनी शासकीय भागभांडवलाच्या प्रमाणात कामकाजात प्रगती करणे आवश्यक आहे.

६) ज्या सूतगिरण्यांनी केवळ शासकीय भागभांडवलाचा वापर करुन उत्पादनाखाली आलेल्या आहेत, त्यांनी पुढील ३ महिन्यात कर्ज उभारणी (प्रकल्प अहवालाप्रमाणे) करावी व सूतगिरण्यांनी कर्ज उभारणी न केल्यास अवसायनाची कारवाई करण्यात येईल.

७) ज्या सहकारी सूतगिरण्यांचे लेखापरीक्षण झालेले नाही, त्यांचे तातडीने ३ महिन्यात लेखापरीक्षण करुन घ्यावे व ज्यांचे लेखापरीक्षणामध्ये गंभीर त्रुटी आहेत, त्यांचेवरही अवसायनाची कारवाई करण्यात येईल.

उपरोक्त निकषास अनुसरुन काटेकोरपणे कार्यवाही करण्याची जवाबदारी संचालक वस्त्रोद्योग नागपूर यांची असेल. सदर निकषास अनुसरुन कार्यवाही करताना महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मधील तरतूदींचे उल्लंघन होणार नाही यांची काळजी संचालक वस्त्रोद्योग नागपूर यांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१९१७२७२८०१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishal Vishvas Madane

Digitally signed by Vishal Vishvas Madane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-op Marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, cn=Vishal Vishvas Madane
Date: 2018.06.19 17:26:49 +05'30'

**( विशाल मदने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०००३२,

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

३) मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,

५) महालेखापाल, (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,

६) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक,

७) प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक,

८) कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,

९) कार्यासन अधिकारी, १६-सी, १७-सी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,

१०) वित्त विभाग, व्यय-२ / अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई-३२,

११) नियोजन विभाग, कार्यासन-१४३१, मंत्रालय, मुंबई-३२,

१२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,

१३) संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय,महाराष्ट्र राज्य, नागपूर,

१४) प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, सोलापूर, औरंगाबाद, नागपूर, मुंबई,

१५) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (मार्फत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, म. रा. पुणे,

१६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,

१७) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,

१८) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती),

१९) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, वकील हाऊस, मुंबई-१,

२०) चेअरमन, सर्व सहकारी सूतगिरण्यां (संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर)

२१) निवडनस्ती (टेक्स १ अ /ब).